राज्यातील कटक मंडळांना मुलभूत सोयी-सुविधा
करीता निधी उपलब्ध करुन देणेबाबत.

# महाराष्ट्र शासन
## नगर विकास विभाग
### शासन निर्णय क्रमांकः कटक-२०१८/प्र.क्र.९३/नवि-०४

मादाम कामा रोड,हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय,मुंबई-४०००३२
दिनांक:- २२ ऑक्टोबर,२०१८

वाचा :-

१) शासन निर्णय क्रमांकः **धोरण-२०१७/प्र.क्र.१७१/नवि-१६ ,दिनांक १७ नोव्हेंबर,२०१७.**

२) शासन निर्णय क्रमांकः **धोरण-२०१७/प्र.क्र.९६/नवि-१६ दिनांक १२ डिसेंबर,२०१७.**

प्रस्तावना :-

राज्यात देहू (जि.पुणे), खडकी (जि.पुणे), पुणे, औरंगाबाद, अहमदनगर, देवळाली (जि.नाशिक), कामठी (जि.नागपूर) अशी एकुण सात कटक मंडळे आहेत. कटक मंडळे ही केंद्र सरकारच्या अखत्यारीत आहेत.कटक मंडळे केंद्र सरकारच्या अखत्यारीत असली तरी राज्य शासनाचा भाग आहेत. सबब राज्यातील कटक मंडळांना विविध विकास कामांकरीता निधी उपलब्ध करुन देण्याबाबत स्थानिक लोकप्रतिनिधीकडून वारंवार मागणी केली जाते. सद्यस्थितीत कटक मंडळांना नगर विकास विभागाच्या तरतुदीतून निधी देण्याबाबत कोणतीही तरतुद नाही. नगर विकास विभागाच्या मंजुर तरतुदीतून सदर कटक मंडळांना विविध विकास कामांकरीता निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

राज्यातील देहू (जि.पुणे), खडकी (जि.पुणे), पुणे, औरंगाबाद, अहमदनगर, देवळाली (जि.नाशिक), कामठी (जि.नागपूर) या सात कटक मंडळांना नगर विकास विभागाच्या मंजुर नियतव्ययातुन मुलभूत सोयी सुविधांसाठी निधी मंजुर करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

**०२.** राज्यातील सात कटक मंडळांना मुलभूत सोयी सुविधांसाठी निधी उपलब्ध करण्यासाठी येणारा खर्च **मागणी क्र.एफ-२**,२२१७, नगर विकास, १९१, महानगरपालिकांना सहाय्य, (००) (०९) “महानगरपालिका क्षेत्रात पायाभूत सुखसोयीच्या विकासासाठी विशेष तरतुद (कार्यक्रम)” (२२१७ ०९१३), ३१,सहायक अनुदाने (वेतनेतर), **मागणी क्र.एफ-५**,४२१७,नगर विकासावरील भांडवली खर्च,१९१,महानगरपालिकांना सहाय्य,(००) (०२)“महानगरपालिका क्षेत्रात मुलभूत सुखसोयीच्या विकासासाठी विशेष तरतुद (कार्यक्रम)” (४२१७ ०५४१),३१,सहायक अनुदाने (वेतनेतर), **मागणी क्र.एफ-२**, २२१७,नगर विकास,१९२,नगरपरिषदांना सहाय्य,(००) (४२) “नगर परिषदांना वैशिष्ट्यपुर्ण

कामांसाठी विशेष अनुदान”,(कार्यक्रम) (२२१७ १३०१), ३१,सहायक अनुदाने (वेतनेतर) व **मागणी क्र.एफ-५**, ४२१७,नगर विकासावरील भांडवली खर्च, १९२,नगरपरिषदांना सहाय्य,(००) (०८)“ नगर परिषदांना वैशिष्ट्यपुर्ण कामांसाठी विशेष अनुदान”,(कार्यक्रम ) (४२१७ ०६०३), ३१,सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षातून निधी उपलब्धतेच्या अधिनतेने भागविण्यात यावा.

**०३.** या निधीतून हाती घ्यावयांच्या कामांबाबत संदर्भ क्र. (१) व (२) येथील शासन निर्णयातील अटी व शर्ती लागु राहतील.

**०४.** कटक मंडळांना वितरीत केल्या जाणाऱ्या सदर निधीवर संबधीत जिल्ह्याचे जिल्हाधिकारी यांचे नियंत्रण राहील.

**०५.** राज्य शासनाच्या वैयक्तिक लाभाच्या योजना (उदा.सार्वजनिक वितरण व्यवस्था, प्रधान मंत्री आवास योजना, आरोग्य विभागाच्या विविध योजना इ.) कटक मंडळ क्षेत्रातील नागरीकांना योजनेच्या निकषानुसार लागु करण्यात याव्यात. संबधीत प्रशासकीय विभागांनी याबाबतचे आदेश मा. मुख्य सचिव यांच्या मान्यतेने परस्पर निर्गमित करावेत.

**०६.** सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.संकिर्ण-१६१८/प्र.क्र.१२/व्यय-०३,दिनांक ०२/०६/२०१८ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

**०७.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१०२२१६४७३२६५२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.**

Vivek Shankar Kumbhar

Digitally signed by Vivek Shankar Kumbhar
DN: CN = Vivek Shankar Kumbhar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Urban Development Department
Date: 2018.10.22 16:59:02 +05'30'

**विवेक कुंभार**
**अवर सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
२. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,सर्व मंत्रालयीन विभाग.
३. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय,वरळी, मुंबई-१८.
४. सर्व विभागीय आयुक्त.
५. सर्व जिल्हाधिकारी.
६. सर्व आयुक्त, महानगरपालिका.

७. मुख्य कार्यकारी अधिकारी, देहू, खडकी, पुणे, देवळाली, अहमदनगर, औरंगाबाद व कामठी कटकमंडळे.

८. मा.राज्यमंत्री (नगरविकास) यांचे खाजगी सचिव.

९. महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई.

१०. महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर.

११. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

१२. सह संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई.

१३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.

१४. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.

१५. सर्व जिल्हा प्रशासन अधिकारी.

१६. वित्त विभाग, व्यय-३/ कोषा प्रशासन-५/अर्थसं-१६/नियोजन विभाग मंत्रालय, मुंबई.

१७. कार्यासन नवि-१६, नगरविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

१८. निवड नस्ती (नवि-०४), नगरविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

***********